**राज्यातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा दर्जावाढ करण्यासाठी संस्था व्यवस्थापन समिती (IMC) मध्ये शैक्षणिक /तांत्रिक/ सामाजिक/व्यावसायिक क्षेत्रातील दोन सदस्यांची नियुक्ती करणे व IMC ची पुर्नरचना करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक आयएमसी-२०१९/प्र.क्र.२००/व्यशि-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ जुन, २०२४

वाचा:-

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शा.नि.क्र.आयटीआय-१००२/८९/व्यशि-१, दि.१२/७/२००२.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शा.नि.क्र.आयटीआय-१००७/(१६०/०७)/व्यशि-२, दि.३०/६/२००७.
३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग शा.नि.क्.आयटीआय २००७/(१६२/०७)/व्यशि-२, दि.३१/१२/२००७.
४) उच्च व तंत्र शिक्षण विभाग शा.नि.क्र.आयटीआय २००७/(५२३/०७)/व्यशि-२, दि.३१/३/२००८.
५) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शा.नि.क्र.पीपीपी-२०१८/प्र.क्र.९०/१८/व्यशि-५, दि.२२/५/२०१८.
६) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शा.नि. क्र.जाबॅंप्र-२६११/प्र.क्र.१८/१९/व्यशि-५, दि.२२/८/२०१९.
७)कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शा.नि.क्र.आयएमसी-२०१९/प्र.क्र.२००/व्यशि-३, दि.१६/३/२०२०.

**प्रस्तावना :-**

राज्यातील २५० औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये केंद्र शासन पुरस्कृत पब्लिक प्रायव्हेट पार्टनरशिप (PPP) ही योजना कार्यान्वित असुन सदर योजनेंतर्गत सन २००७-०८ ते सन २०११-१२ या कालावधीत प्रत्येक संस्थेला रु.२.५० कोटी बिन व्याजी कर्ज केंद्र शासनाकडुन टप्प्याटप्प्याने देण्यात आलेले असुन या कर्जाच्या रक्कमेमधुन औ.प्र.संस्थांचा दर्जावढ तसेच उद्योग व सेवा क्षेत्रातील नविनतम तंत्रज्ञानावर आधारित नविन अभ्यासक्रम सुरु करणे अपेक्षित आहे.

२. राज्यात आजमितीस ३४४ नव्या तुकडया या योजनेद्वारे सुरु करण्यात आलेल्या असुन पीपीपी योजनेंतर्गत औ.प्र.संस्थांकडुन सन २०२४-२०२९ करीता सुधारित संस्था विकास आराखडा (Revised Institute Development Plan-IDP ) तयार करण्यात येत आहेत. पीपीपी योजनेसोबतच जागतिक बॅंक सहाय्यित STRIVE प्रकल्प राज्यातील ५३ औ.प्र.संस्थांमध्ये राबविण्यासाठी संस्था व्यवस्थापन समितीची (IMC) स्थापना करण्यात आलेली आहे.

३. राज्यात पीपीपी योजना राबविणाऱ्या २५० संस्था तसेच STRIVE प्रकल्प राबविणाऱ्या ५३ अशा एकूण ३०३ संस्थांव्यतिरीक्त उर्वरित ११६ संस्थांमध्येही संदर्भ क्र.७ अन्वये संस्था व्यवस्थापन समितीची (IMC) स्थापना करण्याच्या सुचना देण्यात आलेल्या असुन आजमितीस ११६ औ.प्र.संस्थांपैकी ११५ संस्थांमध्ये IMC ची स्थापना झालेली असुन त्यापैकी ९५ संस्थांमधील IMC ची सोसायटी रजिस्ट्रेशन ॲक्ट १८६० अंतर्गत नोंदणीकृत करण्यात आलेली आहे व त्याचा तपशिल खालीलप्रमाणे आहे:

१) पीपीपी योजनेंतर्गत समाविष्ट राज्यातील IMC नोंदणीकृत झालेल्या औ.प्र.संस्था - २५०
२) STRIVE प्रकल्पांतर्गत समाविष्ट राज्यातील IMC नोंदणीकृत झालेल्या औ.प्र.संस्था -५३
(पीपीपी योजनेंतर्गत या पूर्वीच नोंदणी झालेल्या १९ संस्था वगळून)

३) PPP योजना व STRIVE प्रकल्पामध्ये समाविष्ट नसलेल्या राज्यातील उर्वरित संस्था-११६

४) IMC ची स्थापना झालेल्या औ.प्र.संस्था-११५

५) सोसायटी रजिस्ट्रेशन ॲक्ट १८६० अंतर्गत IMC नोंदणीकृत झालेल्या उर्वरित औ.प्र.संस्था -९५

६) राज्यातील IMC नोंदणीकृत झालेल्या एकूण औ.प्र.संस्था -३९८

७) नोंदणी प्रक्रिया सुरु असलेल्या औ.प्र.संस्था-२१

४. या सर्व समितीचा मुळ उद्देश संस्थेला त्यांच्या स्तरावर वित्तीय अधिकार देऊन संस्थेच्या दर्जावाढीसाठी तसेच Industry ४.० सारख्या झपाटयाने बदलत जाणाऱ्या तंत्रज्ञानावर आधारित कौशल्य निर्माण करण्यासाठी आवश्यक दीर्घ व अल्प मुदतीचे अभ्यासक्रम सुरु करणे, तसेच सद्यस्थितीत सुरु असलेल्या व्यवसाय अभ्यासक्रमांच्या कार्यशाळा व प्रयोगशाळांचे आधुनिकीकरण करणे व आवश्यक यंत्रसामुग्री उपलब्ध करुन देणे हा उद्देश आहे. औद्योगिक भागीदार (Industry Partner-IP) व इतर आस्थापनांचाही सहयोग असणे अपेक्षित आहेत. तसेच पीपीपी योजनेंतर्गत समाविष्ट असलेल्या औ.प्र.संस्थांच्या संस्था व्यवस्थापन समिती (IMC) मध्ये यापूर्वीच दोन निमंत्रित सदस्यांना संस्था व्यवस्थापन समितीच्या (IMC) बैठकांना आमंत्रित करण्याच्या सूचना सर्व प्राचार्य तथा सदस्य सचिव, संस्था व्यवस्थापन समिती यांना देण्यात आलेल्या आहेत.

५. जागतिक पातळीवर काम करु शकणारे कुशल मनुष्यबळ निर्माण करण्यामध्ये तसेच त्यांच्या रोजगार व स्वयंराजेगाराच्या संधीमध्ये वाढ होण्यासाठी सर्वकष प्रयत्न संस्थास्तरावर करणे अपेक्षित आहे. या सदस्यांच्या ज्ञानाचा व अनुभवाचा संस्थेला लाभ होऊन एकूणच संस्थेच्या गुणवत्तेमध्ये वाढ होणे अपेक्षित आहे.

६. दि.१६/३/२०२० च्या शासन निर्णयानुसार संस्था व्यवस्थापन समितीची रचना खालीलप्रमाणे आहे.

**संस्था व्यवस्थापन समितीची रचना :-**

| | | |
|---|---|---|
| १ | इंडस्ट्री पार्टनर किंवा इंडस्ट्री असोसिएशन किंवा त्यांचा प्रतिनिधी | अध्यक्ष |
| २ | Industry Partner ने (शक्यतो इंडस्ट्री असोसिएशनने) नाम निर्देशित केलेले नजीकच्या उद्योगांचे तसेच औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये सुरु असलेल्या व्यवसाय अभ्यासक्रमांशी निगडीत उद्योग/उद्योग समुहांचे तीन प्रतिनिधी. | सदस्य |
| ३ | संस्था व्यवस्थापन समितीचे अध्यक्ष व प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था यांनी संयुक्तरित्या नामनिर्देशित केलेले शैक्षणिक क्षेत्रातील स्थानिक तज्ञ | **सदस्य** |
| ४ | औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील वरिष्ठ गट निदेशक/शिल्प निदेशक | **सदस्य** |
| ५ | अध्यक्ष यांनी प्राचार्यांच्या सल्लयाने नामनिर्देशित केलेला विभागामधील उद्योगाचा प्रतिनिधी | **सदस्य** |
| ६ | सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अथवा त्यांनी नामनिर्देशित केलेले प्रतिनिधी | सदस्य |
| ७ | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था | सदस्य सचिव |

या सर्व योजनांच्या संस्था व्यवस्थापन समितीचे (IMC) कार्य अधिक परिणामकारक व गतिमानतेने करण्यासाठी या समितीमध्ये तांत्रिक/व्यावसायिक/शैक्षणिक तसेच सामाजिक क्षेत्रामध्ये उल्लेखनीय कार्य करणाऱ्या तज्ञ व्यक्ती व व्यवसाय शिक्षणाच्या क्षेत्राची आवड असणाऱ्या व्यक्तींचा समावेश करणे काळानुरुप आवश्यक असल्याची व संस्था व्यवस्थापन समितीची (IMC) पुर्नरचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्यातील सर्व औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील संस्था व्यवस्थापन समितीची (IMC) पुर्नरचना करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे. त्यानुषंगाने नविन पुर्नगठित संस्था व्यवस्थापन समितीची (IMC) रचना पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे:-

**प्रस्तावित संस्था व्यवस्थापन समितीची रचना** (Institute Management Committee):-

| | | |
|---|---|---|
| १ | सहयोगी उद्योजक (Industry Partner) किंवा त्यांचा प्रतिनिधी | अध्यक्ष |
| २ | जिल्हयातील अन्य नामांकीत औद्योगिक आस्थापनांचे एकूण चार (०४) प्रतिनिधी | सदस्य |
| ३ | राज्य शासनामार्फत नामनिर्देशित केलेले स्थानिक शैक्षणिक/तांत्रिक/सामाजिक/व्यावसायिक क्षेत्रातील उल्लेखनीय काम केलेल्या आणि व्यवसाय शिक्षणाप्रती रुची असलेल्या दोन (०२) तज्ञ व्यक्ती | सदस्य |
| ४ | महाव्यवस्थापक जिल्हा उद्योग केंद्र | सदस्य |
| ५ | औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील जेष्ठ गट निदेशक/जेष्ठ शिल्प निदेशक | सदस्य |
| ६ | विद्यार्थी प्रतिनिधी | सदस्य |
| ७ | औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचे प्राचार्य | सदस्य सचिव |
| | **एकुण** | **११ सदस्य** |

संस्था व्यवस्थापन समितीतील शासकीय सदस्य वगळता इतर सदस्यांचा कार्यकाळ हा ३ वर्षाचा असेल. राज्य शासनामार्फत नामनिर्देशित केलेल्या २ तज्ज्ञ सदस्यांचा कार्यकाळही “सर्वसाधारणपणे ३ वर्षे अथवा शासनाचे पुढील आदेश यापैकी जे अगोदर घडेल” इतका असेल. सदस्याने त्यांचा कार्यकाळ संपुष्टात येण्या अगोदर राजीनामा दिला असेल तर त्या जागी इतर सदस्यांची नियुक्ती राज्य शासन करेल. तसेच सदर सदस्यांचे संस्था व्यवस्थापन समितीमधील कामकाज व योगदान पाहता त्यांना पुनर्नियुक्ती देणेबाबत निर्णय घेण्याचा अधिकार शासनास असेल.

२. वित्तीय अधिकार- संस्था व्यवस्थापन समितीस प्रशासकीय व वित्तीय अधिकार खालीलप्रमाणे राहतील:-

| शासकीय/खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्था | प्रशासकीय व वित्तीय अधिकार (प्रति करार) |
|---|---|
| प्राचार्य तथा सदस्य सचिव, संस्था व्यवस्थापन समिती औद्योगिक प्रशिक्षण संस्था (Principal cum Member Secretary ) | रु.१.०० लाखांपर्यंत |
| बांधकाम व यंत्रसामुग्री खरेदी समिती (Works & Procurement Committee) | रु.१.०० लाख ते रु.१५.०० लाखांपर्यंत |
| संस्था व्यवस्थापन समितीची गव्हर्निंग काऊन्सिल (IMC of Governing Council) | रु.१५.०० लाखाच्या पुढे |

बांधकाम व यंत्रसामुग्री खरेदी समिती (Works and Procurement Committee) ची रचना खालीलप्रमाणे असेल:

१) संस्था व्यवस्थापन समितीचे अध्यक्ष : **अध्यक्ष**

२) संस्था व्यवस्थापन समितीचे सदस्य सचिव : सदस्य

३) संस्था व्यवस्थापन समितीमध्ये सदस्य असलेले औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील जेष्ठ गट निदेशक/जेष्ठ शिल्प निदेशक : सदस्य

४) संस्था व्यवस्थापन समितीमध्ये नामनिर्देशित केलेला औद्योगिक आस्थापनाचा एक सदस्य : सदस्य

विविध स्रोतांकडुन या योजनेसाठी प्राप्त झालेला निधी राज्य शासनाच्या विहीत अटी व शर्तीनुसार खर्च करणे आवश्यक राहील.

३. सदर समितीबाबतच्या सविस्तर मार्गदर्शक सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

४. संस्था व्यवस्थापन समितीस खालील नमूद अटी व शर्ती बंधनकारक राहतील. तसेच भविष्यात शासनाने वेळोवेळी घातलेल्या अटी व शर्तीसुद्धा बंधनकारक असतील.

१) संस्था व्यवस्थापन समितीमधील औद्योगिक आस्थापनांच्या ५ प्रतिनिधींपैकी एक स्त्री सदस्य असणे अभिप्रेत आहे. तसे शक्य नसल्यास राज्य शासनाने नामनिर्देशित केलेले प्रतिनिधी/सदस्यांपैकी/विद्यार्थी प्रतिनिधींपैकी एक स्त्री सदस्य असणे अभिप्रेत राहील.

२) ज्या संस्थांनी यापूर्वीच नोंदणी केलेली आहे, त्यांनी या शासन निर्णयाप्रमाणे कार्यवाही करून झालेल्या बदलासंदर्भात बदल अहवाल (Change Report) संबंधित मा.धर्मदाय आयुक्त कार्यालयाकडे सादर करणे आवश्यक आहे.

३) या संदर्भात सर्व संस्था व्यवस्थापन समिती व प्राचार्य तथा सदस्य सचिव यांना संचालनालयामार्फत वेळोवेळी मार्गदर्शन करण्यात येत आहे. औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील विकास कामांना गतिमानता येण्याच्या दृष्टीने व प्रशिक्षणात उद्योगांशी / सेवा क्षेत्रांशी अनुरुप सुधारणा व एकूणच संस्थेचा व प्रशिक्षणामध्ये गुणवत्ता

वाढविण्याच्या दृष्टीने सदर संस्था व्यवस्थापन समितीमध्ये वरीलप्रमाणे बदल प्रस्तावित आहे.

४) संस्था व्यवस्थापन समिती-सोसायटीने राष्ट्रीयकृत बँकेत खाते उघडावयाचे आहे आणि संस्था व्यवस्थापन समितीचे सर्व व्यवहार या खात्यामधुन करणे आवश्यक आहे. यापूर्वीच संस्था व्यवस्थान समिती-सोसायटीच्या नावाने खाते उघडलेले असल्यास नव्याने खाते उघडण्याची आवश्यकता नाही.

५) या खात्यामध्ये वेगवेगळया स्त्रोतांद्वारे प्राप्त निधी जमा करावयाचा असुन या निधीचा विनियोग विहीत कार्यपध्दतीने, वित्तिय अधिकाराच्या कक्षेत राहून करणे आवश्यक राहील. सदर खात्याचे लेखा परीक्षण सनदी लेखापालांकडुन (Chartered Accountant-CA) करणे बंधनकारक राहील.

६) समितीला भविष्यात वेळोवेळी जिल्हा स्तर/गौण खनिज समितीद्वारा प्राप्त निधी/खाजगी आस्थापनांकडुन मिळु शकणारा CSR Fund/ माजी विद्यार्थ्यांकडून मिळणारा देणगी निधी तसेच इतर ऐच्छिक देणगी निधी/इतर महामंडळांमार्फत प्राप्त होणाऱ्या निधीच्या खर्चाचे, हिशोबाचे लेखे ठेवणे व त्याचे लेखापरिक्षण करुन घेऊन वार्षिक लेखा अहवाल तयार करणे इ. जबाबदारी सोसायटी रजिस्ट्रेशन ॲक्टनुसार संबंधित व्यवस्थापन समितीची असेल.

७) योजने अंतर्गत (Plan Schemes) प्राप्त झालेल्या निधीचा विनियोग त्याच आर्थिक वर्षात करुन त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate-UC) संबंधितांना सादर करणे आवश्यक राहील. याबाबतचे सर्व संनियंत्रण प्रादेशिक कार्यालयामार्फत करण्यात येईल.

८) संस्था व्यवस्थापन समितीमार्फत खरेदी करण्यात आलेल्या यंत्रसामुग्री हत्यारे व बांधकामाची मालकी ही राज्य शासनाची राहील.

९) सदर समितीमधील सदस्यांच्या अनुभवांचे आधारे संस्था व्यवस्थापन समितीस विकासात्मक कामे पूर्ण करण्यास सहाय्य अपेक्षित आहे.

**५. संस्था व्यवस्थापन समितीची कर्तव्ये व जबाबदाऱ्या:-**

१. औद्योगिक प्रशिक्षण संस्थांकरीता (Institute Development Plan) संस्था विकास आराखडा तयार करणे व मान्यतेसाठी राज्य सुकाणू समितीकडे सादर करणे.

२. संस्था विकास आराखडयामध्ये निश्चित केल्यानुसार विहीत वेळेत योजनेतील विविध कामांची अंमलबजावणी करणे व प्रगतीची देखरेख करणे.

३. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेची दीर्घकालीन उद्दीष्टे/लक्ष्य ठरविणे, औ.प्र.संस्थांमध्ये आवश्यक मुलभूत सुविधांची उभारणी करणे व त्याचे परिरक्षण करणे. उदा.स्वच्छ व शुध्द

पिण्याचे पाणी, स्वच्छ प्रसाधनगृहे, अद्ययावत व सुसज्ज कार्यशाळा, आधुनिक व औद्योगिक क्षेत्राशी निगडीत असलेल्या यंत्र व साधनसामुग्रीची उपलब्धता करणे.

४. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये सुधारणा करण्यासाठी लक्ष्य (Key Performance Indicators) निश्चित करुन साध्य करणे.

५. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेच्या विकासासाठी प्रशिक्षक, यंत्र व साधनसामुग्री व इतर सेवांची गरज निश्चित करुन संस्थेचा दर्जावाढ करणे.

६. राज्य शासनाने निश्चित केलेली खरेदी प्रक्रिया व लेखा परिक्षणासंबंधी प्रक्रियेचे पालन करणे.

७. स्थानिक उद्योगधंद्यांना लागणारे Short Term, Medium Term, Long Term या कालावधीमध्ये लागणाऱ्या आवश्यक कुशल मनुष्यबळाची माहिती गोळा करणे व त्यानुसार कुशल मनुष्यबळ तयार करणे.

८. शिक्षक/कार्यालयीन/प्रशासकीय/पर्यवेक्षकीय कर्मचाऱ्यांना द्यावयाच्या आवश्यक प्रशिक्षणाची गरज ओळखुन संलग्न उद्योग आस्थापनांमध्ये/संस्थांमध्ये प्रशिक्षणासाठी प्रतिनियुक्त करणे.

९. संस्था स्तरावर योजना अंमलबजावणीच्या प्रगतीचे सनिंयत्रण ठेवणे व राज्य सुकाणू समितीला वेळोवेळी अहवाल सादर करणे.

१०. केंद्र/राज्य शासनाच्या विविध योजना उदा. PMKVY ४.०/संकल्प इ. योजनांतर्गत अल्प मुदतीचे अभ्यासक्रम औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये सुरु करणे.

११. प्रशिक्षणार्थ्यांना शिकाऊ उमेदवारी, रोजगार/स्वयंरोजगार मिळण्यासाठी संस्थेमध्ये रोजगार/स्वयंरोजगार व समुपदेशन कक्षाची (TCPC) स्थापना करुन प्रशिक्षणार्थ्यांना त्यासाठी मार्गदर्शन / मदत करणे तसेच त्यांच्या करीअरच्या तीन वर्षांपर्यंत मागोवा (Trace) घेण्याची पध्दत विकसित करणे.

१२. अल्प मुदतीचे अभ्यासक्रमाचे शुल्क, PMKVY/PMKUVA/MSBVE निदेशकांच्या नियुक्ती संदर्भातील निर्णय घेणे व त्यांचे मानधन ठरविणे.

१३. राज्यातील ०६ प्रादेशिक विभागांमध्ये स्थापन करण्यात येणाऱ्या आंतरराष्ट्रीय कौशल्य विकास केंद्र/ प्रबोधिनींमध्ये भाषा विषयाचे प्रशिक्षण/आधुनिक तंत्रज्ञानावर आधारीत अल्प मुदतीचे अभ्यासक्रमाचे प्रशिक्षण संस्थेतील उत्तीर्ण प्रशिक्षणार्थ्यांना प्रोत्साहित करणे व त्यांच्या प्रशिक्षण शुल्काच्या रक्कमेची प्रतिपूर्ती करणे.

१४. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील निदेशक/कार्यालयीन/पर्यवेक्षकीय कर्मचारी व प्रशिक्षणार्थ्यांना द्यावयाच्या आवश्यक प्रशिक्षणाची गरज ओळखून संलग्न उद्योग आस्थापनेमध्ये/ शासनाच्या विभागीय पातळीवरील प्रशिक्षण संस्थांमध्ये संबंधित क्षमता विकास/उजळणी प्रशिक्षण (Capacity Building/Orientation Training) आयोजित करणे.

१५. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत सेमिनार, कार्यशाळा व प्रदर्शने भरवुन त्याचा लाभ प्रशिक्षणार्थ्यांना मिळवून देणे.

१६. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील प्रशिक्षण सुसंगत, परिणामकारक व रोजगार/स्वयंरोजगार, शिकाऊ उमेदवारी मिळण्यास उपयुक्त ठरविण्याच्या दृष्टीने संस्थेत विविध उपक्रम राबविणे.

१७. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील प्रशिक्षणार्थ्यांसाठी On Job Training, दुहेरी शिक्षण पध्दती (Duel System of Training-DST) इ.करीता विशेष प्रयत्न करणे व औद्योगिक आस्थापनांसोबत सामंजस्य करार करणे.

१८. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील सर्व व्यवसाय अभ्यासकमांचे प्रवेश पूर्ण क्षमतेने होण्यासाठी व गळतीचे (Drop Out) प्रमाण कमी होण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना करणे.

१९. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील महिला प्रशिक्षणार्थ्यांचे प्रवेश वाढविण्यासाठी School Connect उपक्रम राबविणे. तसेच या प्रशिक्षणार्थ्यांसाठी विशेष सुविधा उपलब्ध करुन देणे.

२०. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील सर्व यंत्र सामुग्री/इमारत/कार्यशाळा परिरक्षण व द्विवार्षिक रंगरंगोटी करणे.

२१. औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये शासन निर्णयानुसार उत्पादनाभिमुख प्रशिक्षण योजना (POTS) राबवून संस्था विकास निधी व शासनास महसूल प्राप्त करणे.

६. सर्व औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या संस्था व्यवस्थापन समितीला (IMC) उपरोक्तप्रमाणे प्रशासकीय व वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आले असून त्याअंतर्गत निधी खर्च करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०६१३१४५७०८८७०३ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASENJEET KARLEKAR

Digitally signed by PRASENJEET KARLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT,
2.5.4.20=d219c43caa42a6d2c11a62256b2ff3ad939a420c9fb6fa0cb24c3842
14bcee8c, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=58B95820309E7F466AE2AD722C14D2E8910FE2F9D499461E
1829267B19AB9CFC, cn=PRASENJEET KARLEKAR
Date: 2024.06.13 15:11:36 +05'30'

**( प्रसेनजीत कारलेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
२) सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, मुंबई
४) सहसचिव (व्यशि -३), कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
५) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई
६) सर्व सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय (संचालनालयामार्फत)
७) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (संचालनालयामार्फत)
८) प्राचार्य, सर्व संबंधित औद्योगिक प्रशिक्षण संस्था (संचालनालयामार्फत)
९) सर्व अवर सचिव/कार्यासन अधिकारी, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) कार्यासन अधिकारी (उद्योग-४), उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
११) निवडनस्ती (व्यशि-३), कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई